**महाराष्ट्र विकास सेवा, गट-ब मधील परिविक्षाधीन अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करणे, तसेच त्यांना अनुज्ञेय असलेल्या वार्षिक वेतनवाढी मंजूर करण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## ग्रामविकास विभाग
**शासन आदेश क्रमांक:मविसे-१०/प्र.क्र.९०/२०१६/आस्था-३अ**

२५, मर्झबान पथ, बांधकाम भवन,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: ५ नोव्हेंबर, २०१८

**वाचा -**

१)शासन निर्णय, ग्रामविकास विभाग, क्र.मविसे-१०/२०१३/प्र.क्र.१७६/आस्था-३अ, दि.१५.१.२०१४

२)शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.हिंभाप-१००१/१२४५/प्र.क्र.८४/०२/२०-ब, दि.२२.१०.२००२.

३)शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही/प्र.क्र.५/९४/आठ, दि.३.२.१९९४

४)मलोआ अधिसूचना क्र. पी१ (२) (३९) जाने.२०१४/एक, दि.५.७.२०१८

**शासन आदेश-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ अन्वये श्री.संदिप सुखदेव कराड यांची महाराष्ट्र विकास सेवा गट-ब संवर्गात परिविक्षाधीन अधिकारी म्हणून नेमणूक करण्यात आली होती. तसेच संदर्भाधीन शासन निर्णय क्र.२ नुसार श्री. कराड यांनी परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी (जसे कामकाज समाधानकारक असणे, मराठी व हिंदी भाषा परीक्षा उत्तीर्ण होणे, वर्तणूक शोभनीय असणे, तसेच परिविक्षाधीन काळात त्यांनी उपभोगलेल्या रजा विचारात घेणे ) समाधानकारपणे पूर्ण केल्या आहेत.

२. तसेच संदर्भ क्र.४ येथील अधिसूचनेनुसार श्री. कराड दि. २ ते ४ जानेवारी, २०१८ या कालावधीत घेण्यात आलेल्या जानेवारी, २०१४ च्या विभागीय परीक्षेत उत्तीर्ण झाले आहेत . त्यामुळे पुढील तक्त्यातील रकाना क्र. पाच मध्ये नमूद केलेल्या दिनांकापासून त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यास शासन मंजुरी देत आहे. त्याप्रमाणे श्री. कराड यांना अनुज्ञेय असलेल्या वार्षिक वेतनवाढी देवून त्यांची वेतननिश्चिती तात्काळ करण्यात यावी. तसेच श्री. कराड मराठी भाषा (उच्चस्तर व निम्नस्तर) परीक्षा संदर्भातील "महाराष्ट्र शासकीय कर्मचारी (न्यायिक विभागातील

कर्मचाऱ्यांव्यतिरिक्त) मराठी भाषा नियम, १९८७" मधील तरतुदींची पूर्तता करतात. त्यामुळे त्यांना उक्त नियमातील नियम ४(४) मधील तरतुदी अन्वये नियुक्ती प्राधिकाऱ्यांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार शासनाच्या एतदर्थ मंडळाच्या "मराठी भाषा" (उच्चस्तर व निम्नस्तर) परीक्षा उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येत आहे. श्री. कराड हे हिंदी भाषा (उच्च स्तर व निम्न स्तर) परीक्षा संदर्भात शासन निर्णय, सा.प्र.वि., दि.१.१२.१९८४ मधील अटींचीही पूर्तता करतात. त्यामुळे शासन निर्णय, सा.प्र.वि., दि.२२/१०/२००२ अन्वये नियुक्ती प्राधिकाऱ्यास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार श्री. कराड यांना "हिंदी भाषा" उत्तीर्ण होण्यापासून सूट देण्यात येत आहे.

| अ.क्र. | परिविक्षाधीन अधिकाऱ्याचे नाव | रुजू झाल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधीत घेतलेल्या रजा | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री. संदिप सुखदेव कराड | ०६.०२.२०१४ | ४९ दिवस | २६.०३.२०१६ |

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८११०५१२२०४१२५२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Natha Savane

Digitally signed by Rajendra Natha Savane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development And Water Conservation Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303, serialNumber=f049989dbbef93340e9edd88af960a0963746d42baa5c948405b62e821529a99, cn=Rajendra Natha Savane
Date: 2018.11.05 14:38:08 +05'30'

(रा.ना.सवने)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. विभागीय आयुक्त, नाशिक व नागपूर विभाग.
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक व नागपूर.
३. महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
४. संबंधित अधिकारी द्वारा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक.
५. कार्या. आस्था-२ ग्रामविकास विभाग.
६. निवडनस्ती.